**अंधेरी (प.) आंबिवली येथील न.भू.क्र.१४१ अ वरील मुद्रण कामगार नगर व चुनाभट्टी येथील इमारतींचा खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे - मुदतवाढ देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : खाक्षेस-२०१८/प्र.क्र.१०२/रस्ते-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १ ऑक्टोबर, २०१८.

वाचा : शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.खाक्षेस-२००१/प्र.क्र.१३२/रस्ते-८, दिनांक : १ नोव्हेंबर, २००८

**प्रस्तावना** :-

अंधेरी (प.) आंबिवली येथिल मुद्रण कामगार नगर, आंबिवली न.भू.क्र.१४१अ व चुनाभट्टी येथिल भूखंड क्र.६२७ चा खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे या प्रकल्पास मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दि.५ ऑगस्ट, २००८ रोजी बैठकीमध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आली. त्याअनुषंगाने दिनांक १.११.२००८ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला. या प्रकल्पाच्या निविदेस दिनांक १८ ऑगस्ट, २००९ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ पायाभूत समितीच्या बैठकीत मंजूरी देण्यात आली. या कामाचे कार्यारंभ आदेश दिनांक ३१.०८.२००९ रोजी देण्यात आले. प्रस्तुत प्रकल्पाच्या कामास मुख्य अभियंता, मुंबई (सा.बां.) प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी दिनांक ०१.०९.२०१३ ते दिनांक २८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ दिलेली आहे.

या प्रकल्पाचे बांधकाम, चुनाभट्टी येथील राज्य उत्पादन शुल्क व उद्योग विभाग यांचे स्थलांतरण न होणे, वाहतुकीसाठी ९ मीटर रुंदीचा रस्ता उपलब्ध होत नसल्याने बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत परवानग्या प्राप्त न होणे, अंधेरी येथील जमिनीवरील अतिक्रमणे न हटविणे या प्रमुख कारणास्तव विहित कालावधीमध्ये पूर्ण होऊ न शकल्याने या प्रकल्पाच्या कामास दिनांक २८.०२.२०१७ पासून दिनांक २७.०१.२०२१ पर्यंत म्हणजेच ४७ महिन्यांची मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने दि.२३ ऑगस्ट, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या बैठकीत सदर प्रस्तावास मंजुरी प्रदान केली असून, त्यानुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय** :-

अंधेरी (प.) आंबिवली येथिल मुद्रण कामगार नगर, आंबिवली न.भू.क्र.१४१अ व चुनाभट्टी येथिल भूखंड क्र.६२७ चा खाजगीकरणाच्या माध्यमातून विकास करणे या प्रकल्पास दि.२८.२.२०१७ पासून ४७ महिने म्हणजेच दिनांक २७.०१.२०२१ पर्यंत द्वितीय मुदतवाढीस मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय मंत्रीमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २३.०८.२०१८ रोजीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार व नियोजन विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७४/का.१४३३, दि.२१.०८.२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१००११२१५४८३८१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c027c83219049ab50c11c48a886d96688cd20f344566980536900a21e1d9a74b, serialNumber=4be0cd9a533d89e3ab5f3d01c44606657e57bbf30754f79095f947378c30d155, cn=Avinash Trimbakrao Dhondge
Date: 2018.10.01 12:18:13 +05'30'

**(अविनाश त्रिं. धोंडगे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत –**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८) सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) मुख्य अभियंता, सा.बां.प्रादेशिक विभाग, मुंबई
१४) सर्व मंत्रालयीन विभाग
१५) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई